**SARFAESI ACT, 2002 मधील कलम १४ अंतर्गत कालबद्ध पध्दतीने कार्यवाही करण्यासाठी मार्गदर्शक सूचना.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन परिपत्रक क्र.याचिका-०३२२/प्र.क्र.०२/विशा १अ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: १३ एप्रिल, २०२२

**<u>वाचा</u> :** मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.१०७८/२०२२ प्रकरणी मा.न्यायालयाचे दि.२२.०३.२०२२ चे आदेश.

**<u>प्रस्तावना:</u>**

मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.१०७८/२०२२ मध्ये दिनांक २२.०३.२०२२ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी SARFAESI Act, 2002 मधील कलम १४ अंतर्गत जिल्हादंडाधिकारी यांनी कार्यवाही करण्यासाठी Permanent Mechanism तयार करण्याबाबत आदेशित केलेले आहे.

याअनुषंगाने महाराष्ट्र शासनाने क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांना Securitization and Reconstruction of Financial Assets and Enforcement of Security Interest Act, 2002 (SARFAESI Act) मधील कलम १४ अंतर्गत जिल्हादंडाधिकारी यांनी योग्य व कालबद्ध पध्दतीने अंमलबजावणी करण्यासाठी परिपत्रक निर्गमित करण्याचे निश्चित केले आहे. त्यास अनुसरुन जिल्हादंडाधिकारी यांनी SARFAESI ACT, 2002 मधील कलम १४ अंतर्गत खालील मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी.

**परिपत्रक :**

(१) SARFAESI ACT, 2002 मधील कलम १४ अंतर्गत कार्यवाही करताना जिल्हादंडाधिकारी यांनी याचिका क्रमांक Criminal PIL No.२४/२०११ दिनांक २०.०८.२०११, International Assets Reconstruction Company Private Limited Vs Union of India and others प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे.

(२) जिल्हादंडाधिकारी यांनी SARFAESI ACT, 2002 मधील कलम १४ अंतर्गत प्रकरणांवर कार्यवाही करण्यासाठी त्यांच्या कार्यालयात एक कक्ष स्थापन करुन त्यांच्या कार्यालयाने विशेषत अर्ज मिळाल्यावर या उद्देशासाठी ठेवलेल्या एक स्वतंत्र नोंदवहीत नोंद घ्यावी.

(३) सदर नोंदवही जिल्हादंडाधिकारी यांनी वेळोवेळी तपासून दर पंधरवडयात प्रतिस्वाक्षरीत करावी.

(४) कलम १४ अंतर्गत दाखल केलेले सर्व अर्ज जे आवश्यक गोष्टी आणि मार्गदर्शक तत्त्वांचे पालन करतात ते जिल्हादंडाधिकारी यांच्याद्वारे शक्य तितक्या लवकर आणि कोणत्याही परिस्थितीत, योग्य सादरीकरणाच्या तारखेपासून दोन महिन्यांच्या कालावधीत निकाली काढले जावेत.

(५) SARFAESI Act, 2002 मधील प्रकरणांचा जिल्हादंडाधिकारी यांनी प्राप्त प्रकरणे व प्रलंबित प्रकरणे यांचा नियमित आढावा घेण्यासाठी आणि तात्काळ निकाली काढण्याच्या दृष्टीने आवश्यकतेनुसार तंत्रज्ञानाचा वापर करावा.

(६) SARFAESI Act, 2002 मधील कलम १४ अंतर्गत प्राप्त प्रकरणे, निकाली काढण्यात आलेली प्रकरणे व प्रलंबित प्रकरणांचा जिल्हादंडाधिकारी यांनी मासिक गोषवारा तयार करुन तो संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयास सादर करावा.

(७) विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या अंतर्गत येणा-या जिल्हादंडाधिकारी यांच्या SARFAESI Act, 2002 मधील प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी त्यांच्या कार्यालयातील एक उपआयुक्त दर्जाच्या अधिका-याची नोडल अधिकारी म्हणून नेमणूक करावी. नोडल अधिका-याने या प्रयोजनासाठी एक स्वतंत्र नोंदवही ठेवावी. प्रंलबित प्रकरणे निकाली काढण्याच्या दृष्टीने विभागीय आयुक्त यांनी दर तिमाही आढावा घ्यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४१३१७४०२६९३२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.04.13 17:42:03 +05'30'

**(संजय खेडेकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) निबंधक,मा. उच्च न्यायालय , मुंबई, खंडपीठ नागपूर .
२) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) सर्व जिल्हाधिकारी.
६) सरकारी अभियोक्ता ,मा. उच्च न्यायालय , मुंबई, खंडपीठ नागपूर .
७) निवड नस्ती .